**राज्यातील अल्पसंख्याक बहुल भागातील**
**विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत**
**दुसरी / तिसरी पाळी सुरू करणे.**
**सन २०१४-१५ करिता अनुदानाचे वाटप.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः औप्रसं-२०१४/प्र.क्र.५४/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ३१ मार्च, २०१५.

**वाचा -**

१) **शासन निर्णय क्रमांकः उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक :आयटीआय-२००९/ (११/०९)/व्यशि-३, दि. २९/८/२००९ व दि.२१.८.२०१०**

२) **समक्रमांकाचे शासन निर्णय दिनांक : दि.१५ जुलै, २०१४ व दि.११ फेब्रुवारी, २०१५.**

३) **शासन परिपत्रक क्रमांकः वित्त विभाग, पूरक-२०१५/प्र.क्र.७६/अर्थसंकल्प-३, दि.२४ मार्च, २०१५**

**प्रस्तावना -**

राज्यातील अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांसाठी ४२ अल्पसंख्याक बहुल भागातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये दुस-या/तिस-या पाळीत २४८ तुकडया त्याचप्रमाणे बृहन्मुंबईतील मांडवी व चांदिवली (पवई) येथे नव्याने सुरू होणा-या २ नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये २८ तुकडया सुरू करण्यास दि.२९.८.२००९ व दि. २१.८.२०१० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सन २०१४-१५ या वर्षात आतापर्यंत एकूण रु.११,०७,७२,०००/- (रुपये अकरा कोटी सात लाख बाहत्तर हजार फक्त ) इतक्या निधीचे वितरण करण्यात आले आहे. संदर्भ क्रमांक ३ येथील वित्त विभागाचे दि.२४ मार्च, २०१५ च्या सन २०१४-१५ चे खर्चाचे पूरक विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे पूरक मागण्यांच्या रक्कमांचे वाटप करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांसाठी सुरू करण्यात आलेल्या ४२ विद्यमान शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था तसेच बृहन्मुंबईतील मांडवी व चांदिवली (पवई) येथे नव्याने सुरू होणाऱ्या २ नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थाकरिता "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना, (००) (१६) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी सुरू करण्यासाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए ५३४)" या लेखाशीर्षाखाली आता

खालीलप्रमाणे रू.५,३७,९९,०००/- (रूपये पाच कोटी सदतीस लाख नव्याण्णव हजार फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे. आता वितरीत केलेल्या अनुदानामुळे सन २०१४-१५ साठी बी.डी.एस. वर उपलब्ध झालेल्या अनुदानाप्रमाणे अनुदानाचे पूर्णतया पुढीलप्रमाणे वितरण करण्यात येत आहे :-

(रुपये हजारात)

| अ.क्र. | मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यकम, राज्य योजनांतर्गत योजना, (००) (१६) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी सुरू करण्यासाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए ५३४)" | या शासन निर्णय अन्वये वितरीत करावयाचे |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | ०१ वेतन | ५०००० |
| २ | १० कंत्राटी सेवा | १०८० |
| ३ | ११ देशांतर्गत प्रवास खर्च | १३५ |
| ४ | १३ कार्यालयीन खर्च | ३२४ |
| ५ | २१ सामग्री व पुरवठा | ७०२ |
| ६ | २६ जाहिरात व प्रसिध्दी | १४ |
| ७ | २७ लहान बांधकामे | २७० |
| ८ | २८ व्यावसायिक सेवा | १२६० |
| ९ | ५२ यंत्रसामुग्री व साधन सामुग्री | १४ |
| **एकूण** | | **५३७९९** |

२. सदर तरतूद संचालक, (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते नियंत्रक अधिकारी आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. संचालक, (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी निधी वितरीत करतांना तसेच तो खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वेळोवेळी शासनाने या अनुषंगाने दिलेले सर्व निदेश/नियमांचे पालन करावे.

४. या योजनेअतंर्गत अल्पसंख्याक समाजातील विघार्थ्यांना प्रवेश देण्यात येऊन त्याचा तपशील वेळोवेळी अल्पसंख्याक विकास विभागास सादर करावा.तसेच सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र ( Utilization Certificate ) संचालक, (प्रशिक्षण) व्यवसाय

शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी विहीत मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११२३७५८७३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samir Ramesh Salunkhe

Digitally signed by Samir Ramesh Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samir Ramesh Salunkhe
Date: 2015.03.31 14:21:53 +05'30'

**( समीर साळुंखे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
३. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई ,
५. प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था (सर्व), महाराष्ट्र राज्य, संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे मार्फत अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
७. सर्व संबधित जिल्हा कोषागार अधिकारी, संचालक (प्रशिक्षण), व्य.शि. व प्र. संचालनालय यांचे मार्फत
८. नियोजन विभाग का. १४७५,
९. वित्त विभाग, व्यय-४/ अर्थ-३ व १४,
१०.अवर सचिव (का.७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर रक्कम बी.डी.एस. वर तात्काळ उपलब्ध करून देण्याची विनंती करण्यात येत आहे.
११.निवडनस्ती.